**अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत कोल्हापूर पाटबंधारे विभाग, कोल्हापूर अधिनस्त गडहिंग्लज पाटबंधारे उपविभागा अंतर्गत घटप्रभा पाटबंधारे शाखा, अडकूर ही सिंचन शाखा निर्मिती करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण २००७/(१७४/२००७)/सिंव्य(महसूल)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २८ मार्च २००८

संदर्भ :- अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली यांचे पत्र क्र. सांपामं/आ ५/६९१/०८, दि. ३०/१/२००८

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत कोल्हापूर पाटबंधारे विभाग, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील गडहिंग्लज पाटबंधारे उपविभाग, गडहिंग्लज अंतर्गत हिरण्यकेशी पाटबंधारे शाखा, गडहिंग्लज व तुर्केवाडी पाटबंधारे शाखा, तुर्केवाडी या शाखेकडे एकूण १६,४६० इतक्या हेक्टर सिंचन क्षेत्राची विभागणी करुन घटप्रभा पाटबंधारे शाखा, अडकूर येथे नवीन सिंचन शाखा निर्मिती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली अंतर्गत, कोल्हापूर पाटबंधारे विभाग, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील गडहिंग्लज पाटबंधारे उपविभाग, गडहिंग्लज अंतर्गत हिरण्यकेशी पाटबंधारे शाखा, गडहिंग्लज व तुर्केवाडी पाटबंधारे शाखा, तुर्केवाडी या शाखेकडील एकूण १६,४६० इतके सिंचन क्षेत्र विचारात घेता कपूर समितीच्या अहवालानुसार सिंचन शाखेचे मानक ४००० हेक्टर असून प्रस्तावित अडकूर शाखेकडे एकूण ३,३८३ हेक्टर क्षेत्र वर्ग केल्यास सिंचन व्यवस्थापनाच्या नियोजनासाठी सोयीच्या दृष्टीने अडकूर येथे स्वतंत्र शाखा निर्मितीस खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

 संकेतांक क्रमांक - 201412091323332627

१) गडहिंग्लज व तुर्केवाडी या शाखेसाठी सध्याचे मंजूर पदांपैकी काही पदे घटप्रभा पाटबंधारे शाखा, अडकूर या नवीन सिंचन शाखेसाठी अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली यांनी उपलब्ध करुन द्यावी.

२) अडकूर शाखा निर्मितीमुळे एकूण मंजूर पदांमध्ये वाढ होणार नाही. तसेच प्रशासकीय आस्थापना खर्चात कोणतीही वाढ होणार नाही. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

अडकूर येथील नवीन सिंचन शाखा निर्मितीमुळे सिंचन क्षेत्रात होणारा बदल दर्शविणारा तक्ता सोबत जोडला आहे.

सिंचन महामंडळाकडील आस्थापना ही शासनाच्या नियंत्रणाखाली असल्याने हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. १०९२/सीआंर/८०६/व्यय ६, दि. १५/१०/१९९२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रा.म.सकपाळ )
शासनाचे अवर सचिव

प्रत,

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल-१,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल-१, लेखा परीक्षा महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे,
अधीक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली,
कार्यकारी अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे विभाग, कोल्हापूर,
आ(शा.अ.)/आ(प्रशि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
सिंच(म) संग्रहार्थ.

Dkb 11002

शासन निर्णय क्र. संकिर्ण-२००७/(१७४/२०७)/ सिव्य (महसूल) दिनांक २८ मार्च २००८ चे सहपत्र.

(गडहिंग्लज पाटबंधारे उपविभाग, गडहिंग्लज अंतर्गत हिरण्यकेशी व तुर्केवाडी या शाखेच्या विभाजनानंतर निर्माण होणा-या शाखा कार्यालयाची नावे व मुख्यालये. )

| अ.क्र. | उपविभागाचे नाव | विभाजनानंतर निर्माण होणारी शाखा कार्यालये व मुख्यालये | कार्यक्षेत्र | सिंचनक्षेत्र |
|---|---|---|---|---|
| १. | गडहिंग्लज पाटबंधारे उपविभाग, गडहिंग्लज | घटप्रभा पाटबंधारे शाखा,अडकूर ता. चंदगड | घटप्रभा नदी | |
| | | | को.प. बंधारेचे नाव | |
| | | | १.पिळणी, चंदगड | १६२ |
| | | | २. बिजूर-भोगोली, चंदगड | १३६ |
| | | | ३.हिंडगाव, चंदगड | ११२ |
| | | | ४.कानडी-सावर्डे, चंदगड | ११५ |
| | | | ५.अडकूर, चंदगड | ४३४ |
| | | | ६.तारेवाडी, गडहिंग्लज | १३६ |
| | | | **ल.पा.तलाव** | |
| | | | १. कुमरी ,ता. गडहिंग्लज | ५२५ |
| | | | २. लकीकट्टी , चंदगड | ११९३ |
| | | | ३. निटटूर क्र.२ , ता. चंदगड | ५७० |
| एकूण सिंचनक्षेत्र | | | | ३३८३ |